**राज्यातील शासकीय गोदामांमध्ये अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी आवश्यक साधनसामुग्री खरेदी करण्यासाठी विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सामुग्री-४५२३/प्र.क्र.६८/नापु-१६ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २६ एप्रिल, २०२३

**वाचा:- १) उद्योग,उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र:-भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग-III/उद्योग-४,दि.०१.१२.२०१६.**
**२) अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग, शासन निर्णय क्रमांक:-सामुग्री- ३१३६/ प्र.क्र.१७१ / नापु-१६अ, दि.१७.०४.२०१७**
**३) अ.ना.पु. व ग्रा.सं. विभाग, शासन निर्णय क्रमांक:-सामुग्री- ३१२१/ प्र.क्र.१०४/ नापु-१६अ, दि.०७.१०.२०२१**

**प्रस्तावना -:**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ च्या सोबत जोडलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या सुधारीत नियम पुस्तिकेतील प्रकरण क्र.२ मधील २.९.२ मध्ये राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्याबाबतचे निर्देश देण्यात आलेले आहेत.

उक्त निर्देशाच्या अनुषंगाने या विभागामार्फत राज्यातील शासकीय धान्य गोदामातील आवश्यक साधन सामुग्रीची खरेदी करण्यासाठी यापूर्वीचा शासन निर्णय दि.१७.०४.२०१७ हा अधिक्रमीत करून शासन निर्णय ०७.१०.२०२१ अन्वये विभागीय भांडार खरेदी समितीची स्थापना कार्यासन नापु-१६ अ यांच्यामार्फत करण्यात आलेली होती. दरम्यानच्या कालावधीत झालेल्या विषयांच्या हस्तांतरणाच्या अनुषंगाने नव्याने सुधारीत विभागीय भांडार खरेदी समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-:**

राज्यातील शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी लागणारी सुतळी, पोती शिवणयंत्रसाठी लागणारा धागा व अन्नधान्याच्या सुरक्षेसाठी लागणारी ताडपत्री व इतर आवश्यक साधन सामुग्रीची खरेदी करण्यासाठी विभागीय भांडार खरेदी समिती स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार खरेदी समितीची स्थापना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | **अध्यक्ष** |
| २. | नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा (MTR), मुंबई | **सदस्य** |
| ३. | संचालक, नागरी पुरवठा, मुंबई | **सदस्य** |
| ४. | सह सचिव/ उप सचिव ( नापु-१६ब) | **सदस्य** |
| ५. | वित्तीय सल्लागार व उप सचिव, अ.ना.पु. व ग्रा.सं.वि. | **सदस्य** |
| ६. | सह सचिव/ उप सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | **सदस्य** |
| ७. | भांडार खरेदी समितीचे प्रतिनिधी ( उद्योग संचालनालय, मुंबई) | **सदस्य** |
| ८. | अवर सचिव/ कक्ष अधिकारी ( नापु १६-ब) अनापु व ग्रास | **सदस्य सचिव** |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२६१७५८११७७०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE91C22A99ADBAFEB91E1127B17CEF54D9C48672DC90AC9562BA7F619961CBBB, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2023.04.26 18:05:05 +05'30'

**(सतिश सुपे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१ मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग यांचे खाजगी सचिव
२ प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय मुंबई
३ नि यंत्रक, शिधावाप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
४ संचालक, नागरी पुरवठा, मुंबई
५ सर्व उपायुक्त ( पुरवठा), विभागीय आयुक्त कार्यालय
६ सर्व जिल्हाधिकारी ( मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून )
७ उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
८ उपसंचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई
९ वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग, मुंबई
१० वित्त विभाग ( व्यय-४), मंत्रालय, मुंबई
११उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
१२विकास आयुक्त (उद्योग) व मध्यवर्ती भांडार खरेदी संघटना, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
१३ खरेदी समितीचे सर्व पदाधिकारी
१४ निवड नस्ती/ ना.पु.१६ब संग्रहार्थ.